# जागतिक किर्तीचे चित्रकार

# के. हिरेमठ

# आणि नाडी ग्रंथ भविष्य

## कार्टून्स आणि पेंटिंग्ज




## आणि कुडलैय्या हिरेमठ मला भेटले...



□. □ □

(No of Book 79 . Category ३. नाडी ग्रंथ मराठी ई पुस्तके, प्रेझेंटेशन)

17 June 2024

के हिरेमठ त्यांची गणना जगातील उच्च वॉटरकलर पेंटिंग्ज चित्रकारात होते. त्यांनी नाडी महर्षींची एकाहून एक बहारदार कलाकृती निर्माण केल्या आहेत. शिवाय मजकुराला साजेल अशी चित्रे काढून वाचकांच्या मनात एक वेगळे स्थान निर्माण केले आहे. त्यांची या कामाला कशी सुरवात झाली याची रंजक माहिती नाडी ग्रंथ प्रेमींना वाचाविशी वाटेल. मी सन २००३ पासून पुण्यात स्थायिक झाल्यावर नाडी महर्षींची ओळख चित्रांच्या माध्यमातून झाली तर किती चांगले होईल असे वाटून योग्य चित्रकारांच्या शोधात होतो. एका कला प्रदर्शन दालनात ते भेटले. नंतर त्यांनी आमच्या मनातील संकल्पना स्केचेस काढून समजून घेतल्या. आपल्या हस्तकलेतून एक एक व्यक्तिरेखा ते साकार करत राहिले. हजारो रुपयांच्या कलाकृती विकत घेणारे रसिक आश्रयदाते त्यांना लाभले.

'महाशिव आणि आदि शक्ती यांना आळवून सप्तर्षी नाडी ग्रंथांतून भावी मानवी पिढ्यांना मार्गदर्शक होऊ दे' म्हणून करूणा भाकतानाच्या चित्रातून शिव पार्वती आनंदाने आशीर्वचने देत आहेत अशी मानसिकता तयार होते. पर्वतशिखरांवर सूर्य किरणांनी पाडलेल्या सोनेरी रंगाने त्यांची अंगकांती उजळून दिसतेय...



# महर्षी अत्री व माता अनसूया गुरुकुलामध्ये जीवनाडीद्वारे मार्गदर्शन करताना



ॐ सोबतच्या चित्रामध्ये पिंपळाच्या पारावर विराजमान होऊन महर्षी अत्री जातकांना मार्गदर्शन असतांना दिसत आहेत...

ॐ तिथेच त्यांच्या शेजारी माता अनसूया फुलांचा हार बांधताना जातकाच्या प्रश्नाच्या अनुषंगाने महर्षींचे मार्गदर्शन ऐकत आहेत.

ॐ गुरुकुलातील रम्य आणि शांत वातावरणात मागील बाजूस महर्षींचे शिष्यगणांपैकी काहीजण नाडिग्रंथलेखनाचे कार्य करत आहेत, तर इतर काही शिष्य ग्रंथांची वर्गवारी करून रचून ठेवण्याचे कार्य करत आहेत.

ॐ चित्रातील हरिणांची जोडी जातकांची धारणा दर्शवते. बहुधा ज्यास प्रश्न पडलेला असतो, तो प्रश्नाचे उत्तर श्रद्धापूर्वक ऐकतो, आणि त्यासोबत

आलेला साक्षीदार विचलित मनाने ऐकत असतो. त्याचप्रमाणे इथे एक हरिण श्रद्धापुर्वक ऐकतेय तर दुसरे विचारात पडलेय.

ॐ ती गोमाता लक्ष देऊन पहातेय! ईश्वरी ज्ञानाचा साठा पाण्याच्या हौदाच्या रूपाने दर्शवलाय, तर महर्षींचे मार्गदर्शन हे ईश्वरी प्रेरणेनेच असल्याचे दर्शवण्यासाठी ज्ञानरूपी पाण्याने भरलेला कमंडलू दिसतोय.

ॐ शुभकार्यामध्ये विघ्न आणण्यात संतोष मानणारे सशांच्या रूपाने दिसत आहेत. त्या सशांचे लक्ष समोर ठेवलेल्या केळ्याकडे (स्वतःच्या तृप्तीकडे) आहे, तर "याद राख, शुभकार्यात विघ्न आणशील तर" असे म्हणत सशांमध्ये आणि केळ्यांमध्ये एक दंड ठेवला आहे.

ॐ कुठलेही शुभकार्य ईश्वराच्या आशीर्वादाशिवाय शक्य नाहीच - श्री दत्तात्रेय संपूर्ण आशीर्वाद देताना दिसत आहेतच, आणि झाडावर बसून हे सारे बघणारे राघू मैना म्हणजे शिव-शक्ती नाडीग्रंथजागृती करणारे आम्ही स्वयंसेवक संपूर्ण आशीर्वाद देतायेत.

महर्षी अगस्त्यांची व्यक्तिरेखा साकार करणारे हे रंगित चित्र आता सार्वत्रिकपणे वेगवेगळ्या माध्यामातून प्रकाशात येत आहे. नाडी ग्रंथ भविष्य जगतात अगस्त्यांचे स्थान उच्च कोटीतील आहे. आजकाल नाडी केंद्रातून भविष्य कथन करायला ताडपट्ट्यांचे जे साठे  उपलब्ध आहेत त्याचे कर्ता महर्षी ते आहेत. अगस्त्यांच्या निर्देशनातील ९० टक्के ताडपत्रे लेखन एकट्या अगस्त्य महर्षींच्या नावाने प्रचलित ताडपट्ट्यातून केले जाते.

त्यांचे प्रत्यक्ष वास्तव्य आजही अगस्त्य वनात सद्धुरगिरीपाशी असते. जीव नाडीपट्ट्यातून ते जातकाला सांगितले जाते.

वेल्लोर जवळचे तरूण नाडी वाचक जानकीरामन यांच्याकडून सध्या अगस्त्य  जीवनाडीचे वाचन वेगवेगळ्या स्थानी जाऊन करायचे आदेश येतात. त्यासाठी कोणी हजर राहायचे ते अगस्त्य महर्षी आधी वाचनातून सांगतात. नुकतेच असे वाचन वाराणसी, काशीत गंगापात्रात नावेत बसून करण्यात आले. त्या जीवनाडीतून अन्य सिद्धर महर्षी आपापल्या वाणीचे कथन करतात. या शिवाय पुज्य रमणी गुरुजींचे धाकटे

चिरंजीव श्री. (तमिळमधे तिरु) शंकरजी रात्री १२ नंतर तांबरमच्या रमणीगुरुजींच्या घरासमोरील आश्रमात हातात पट्ट्या न घेता उत्स्फूर्तपणे बोलून करतात. तंजावूरमध्ये तिरु गणेशन त्यांच्या कडील ताडपट्टातून अगस्त्य महर्षींची वाणी गातात. आपण पाहू गेले तर त्यापट्टीवर काहीच लिहिलेले दिसत नाही. कै. हनुमत दासन यांची ख्याती जगभर झाली होती. त्यांच्या नाडीतून निर्माण झालेल्या २५० कथातून थक्क करणारे अनुभव लोकांना येतात.

त्यांच्या व्यक्तिमत्वाचे चौफेर दर्शन करणारी ही कलाकृती के हिरेमठींची एक देणगी आहे. कमंडलूधारी त्यांच्या मान्यता प्राप्त बुटक्या शरीर यष्टीमागे नाडी ताडपत्रांचे ओवलेले रूप महर्षींचा नाडी भविष्य विषयाची महानता दर्शवते. आश्रमाच्या शांत वातावरणात दोन शिष्यगण नुकतेच पटापट लिहून काढलेले कच्चे टिपण आपापसात चर्चा करून ताडपत्रांवर कोरून लिहिताना दिसतात. आख्यायिकेतून के. हिरेमठांनी कृद्ध विंध्य पर्वताला नमवून अगस्त्यांनी दक्षिण भारतात आपले निवासस्थान केले याचे सूचक दर्शवले आहे.

रामायणात महर्षी अगस्त्य श्रीरामांना आपल्या प्रवरा नदीतिरावरील आश्रम प्रयोगशाळेत बोलावून अनेक तऱ्हेची आधुनिक शस्त्रास्त्रे बलाढ्य रावण नामक असूरी शक्तीशी लढायला प्रदान करतात. तांब्याच्या घटातून वीज निर्मिती करता येते हे अगस्त्य संहितेतून कळते. अनेक धातूंना खाणीतून काढून प्रक्रियाकरून त्याला व्यवहारात वापरायच्या वस्तू बनवायचे काम अगस्त्यांच्या अनेक लोकपुरक कामांपैकी एक आहे. अनेक ठिकाणी अशा वस्तू निर्मितीचे कारखाने त्यांच्या शिष्यगणांकडून चालवले जात असावेत.

सध्या तो आश्रम संगमनेरजवळ अकोले या गावात आहे. अगस्त्य महर्षींमुळे कावेरी नदी तमिळनाडू राज्यात सुफलदायिनी झाली. ते दाखवताना  पर्वतातून उगम पावलेल्या कावेरीनदीचे पात्र नियोजित करून वाया जाणारे पाणी नियमित केले असे हिरेमठांनी खुबीने दर्शवले आहे. आज संपूर्ण राज्याला तांदुळाची शेती यामुळे शक्य झाली आहे. अशी तमिळलोकांची श्रद्धा आहे.

संस्कृत भाषेला नियमबद्ध करायचे काम पाणिनी यांच्या कडून झाले, तमिळभाषेला बोलीतून व्याकरणबद्ध करायचे काम ही अगस्त्यांची भाषाशास्त्री म्हणून महान देणगी आहे. प्राचीनतम भाषा म्हणून तमिळला जगातून मान्यता आहे. अलंकारिक काव्य निर्मितीचे कडक नियम पाळून नाडी ग्रंथांची रचना मानवी बुद्धीला चकित करून सोडते.

# भृगु आणि त्यांचे पुत्र शुक्राचार्य यांच्या आश्रमात



ॐ उत्तर भारतात भृगु आणि शुक्राचार्य संवादातून भृगुसंहिता जातकांना त्यांच्या समस्या सोडवायला मदत करते. या शिवाय सूर्यसंहिता, कपाली संहिता, अशा अन्य महर्षींनी देवनागरी लिपीत कर तर काही ठिकाणी पाली लिपीत पहायला मिळतात.

ॐ या चित्रातून हिरेमठांच्या कुंचल्याने भृगु आश्रमाची सकाळ दर्शवली आहे. अर्धवर्तुळाकार कट्ट्यावर कधी पाय सोडून तर कधी मांडी घालून बसण्याचा शीण जावा. महर्षींचे लक्ष सर्व शिष्य गणांवर रहावे अशी व्यवस्था दर्शवतात. शेजारी बसलेले शुक्राचार्य भृगूंना

ॐ अवकाशातील ग्रह, तारे, नक्षत्रे यांच्या स्थल-काल दर्शक भ्रमणाने होत असलेल्या कुंडल्यातून जातकाच्या नावानिशी भविष्य कथन करत आहेत. त्याचे कच्चे टिप्पण नंतर पक्के करायला  समोर बसलेले लेखनिक शिष्य ते बोलत असताना समजून घेत आहेत.

ॐ शेण सडा करून रांगोळी काढून वातावरम प्रसन्न करायला मदत झाली आहे. आश्रमात महर्षींची भेट द्यायला आलेल्यांच्या सन्मानार्थ लाल गालिचा आंथरलेला आहे. पिंपळ वृक्षाच्या एका बाजूच्या फांदीवर मोर दिसतात. दुसरीकडील फांदीवर पोपटांची जोडी शिवपार्वतीच्या अस्तित्वाची साक्ष देते.

ॐ झाडाच्या मागे राहून चाललेल्या चर्चासत्रात पाणी, मध्यांतरात दूध, फलाहार देण्यासाठी तत्परतेने ऊभे आहेत. काही व्यक्ती आश्रमाची शिधा सामुग्रची व्ययस्था करायच्या बोलण्यात दंग आहेत.

ॐ अन्य आश्रमवासी परिसराची साफसफाई, गाई-वासरांची चारापाण्याची सोय करत आहेत.

# आशय आणि माहिती दर्शवणारी बहारदार कार्टून्स



शांती दीक्षा करायला चाललेले, डोक्यावरील आपले सामान खाली ठेवायला तयार नसलेले काका. रेल्वे प्रवासात  चेष्टेचा विषय होतात.  अत्यंत  लोकप्रिय झालेले हे चित्र सुचवते आहे की आपल्या प्रत्येकाच्या डोक्यावर पूर्वकर्मांची ओझी आहेत इतरांना ती दिसत नाहीत. नाडी ग्रंथ  पाहिलेल्यांना  त्याची जाणीव होते. शांतीदीक्षेचे सोपस्कार जरी खर्चिक वाटले तरी करावेत. असे महर्षी सुचवतात. सवड, खर्च पाहून, करू नंतर असे विचार टाळावेत.






हवाईदलातील नोकरी सांभाळून
हा मी एकटा काय काय करू?

त्याची सोय केलेली आहे, ती
योग्य वेळ आली की मिळेल



विविध देवी-देवतांना चार हात असतात असे चित्रात दिसतात. ग्रुप कॅप्टन राकेश नंदा यांचे चित्र काढायची वेळ आल्यावर हिरेमठांना सुचलेला ही कलाकृती, असे ही दर्शवते  की प्राचीन काळापासून  मुर्तिकारांना शिल्पातील व्यक्तिचे कलागुण एकत्रित दाखवायचे असतील तर असे चाार हात, जास्त मुखे दाखवून अपेक्षित प्रभाव निर्माण करता येतो.

ग्रुप कॅप्टन राकेश नंदांचे व्यक्तित्व ते लीलया एकाच वेळी ५-६ मोबाईल कसे हाताळतात. ते त्यांना प्रत्यक्ष भेटल्यावर कळून येते!



पारशी फिरोज मिस्त्री आपल्या कुटुंबासह कल्याणीनगर भागातील बंगल्यात राहतात.आपापसात गुजरातीतून बोलतात. 'आज रात्री आम्ही महर्षी तुला घरी भेटायला येणार आहोत 'असे रीडिंग आल्यावर कोणालाही चेष्टा वाटेल! ते कसे काय शक्य आहे असे पहायला खुद्द नाडी वाचक आपल्या इतर वाचकांसमावेत आहे होते. सौ. शहनाझ यांच्या लक्षात आले की आज सकाळपासून बंगल्याच्या नर्सरीतील ब्रह्मकमळाच्या वेलीला फारच कळ्या लाागल्या आहेत. त्या फक्त रात्रीच उमलतात ते ही १२ नंतर. त्यांनी पुजेची तयारी केली. रात्री २२ ब्रह्म कमळे उमलली. १८ नाडी महर्षी असे मानतात, मग हे चार आणखी कोण असावेत? याचा खुलासा नंतरच्या रीडिंगमधून झाला की ते तूम्हा उभयतांचे माता-पिता होते!

1. व्यंगचित्र - नाडीवाचनात रंगलो मी।



अय्या, अहो सॉरी, ओकांचे नाडीभविष्य वाचनायत वाटतं. मग असे होणारच....

- ✓ आता काय सांगायचं तुम्हाला अहो, नाडी ग्रंथाचे गारूड असे काही विलक्षण आहे....
- ✓ तुमचे पुस्तक अप्पा बळवंत चौकातील जोशी ब्रदर्सच्या दुकानातून घेतले आणि रस्ताभर वाचत सुटलो.
- ✓ वाटेत काहीना धक्के देत माझी स्वारी जात होती.
- ✓ इति ॲडव्होकेट राजेंद्र पाठक आपल्या मुलाखतीत सांगतात...




- अंनिस धाकटी व मोठी पाती यांचे आवडीचे विषय...
- पेपरवाले अशा बातम्यांचे काहूर उठवून समाजाची अवनिती व्हायला
- हिंदू समाज कसा जबाबदार आहे असे वारंवार दाखवायला तत्पर असतो.

आत्ता पर्यंत आपल्या लक्षात आले असेल की दुसरे काही सावज हाती आले नाही की अंनिसला फलज्योतिष हा विषय त्यांना पंच बॅग सारखा उपयोगी पडतो. ग्रह-तारे यांचा मानवावर प्रभाव पडतो त्याचा पुरावा द्या अशी मागणी करून केंव्हाही त्यांना ठोसे लगावून सळो की पळो करता येते.

मात्र पुरावा मागणारे हे लोक नाडी ग्रंथांच्या ताडपट्टीतील नावे व अन्य मजकुराची शहानिशा करा व तो मजकूर खोटा आहे याचा पुरावा सादर करा असे म्हटले की ते एकदम चुप होतात.



## ❖ फलज्योतिष - एक बडवणे -

❖ फलज्योतिषाला नावे ठेवणाऱ्यांना पूर्णपणे माहित आहे की ते कधीच हरणार नाहीत. परंतु एखाद्या घरातील खाष्ट सासू सोशिक सुनेवर डाफरायला जशी इतर काही कारण मिळाले नाही की 'जेवणात मीठ कमी ' नामक केंव्हाही वापरता येणाऱ्या बडवण्याने सुनेचा उद्धार करायला सदैव तयार असते तसे बुद्धिवादी, निरीश्वरवाद्यांकडे "फलज्योतिष" हे एक "बडवणे" हत्यार तयार असते. त्याचा वापर ते व प्रसिद्धी माध्यमे त्यांना हवा तसा करून घेतात.

❖ मात्र खाष्ट सासूच्या मुलाला आपलेसे करून सून तिला जशी चुप करते, तसे फलज्योतिषी नाडीग्रंथांच्या मदतीने विरोधकांना चुप करतात. आपल्याकडून माहिती काढून तीच परत आपल्याला नाडीभविष्य म्हणून सांगतात या पलिकडे विरोधकांकडे नाडीग्रंथांना नावे ठेवायला कारण मिळत नाही.

❖ आपण शोधकार्य केल्याचे ते म्हणतात. पण नाडी ग्रंथात व्यक्तीची नावे कोरून कशी येतात?

❖ यावर भाषा-लिपीचे तज्ज्ञ मिळत नाहीत अशा सबबी सांगून ते नाडीग्रंथाकडे सोईने दुर्लक्ष करतात.

❖ नाडीग्रंथांकडे फलज्योतिषांनी सहानुभूतीने पहाण्यात त्यांचे हित आहे याची जाणीव त्यांना हळूहळू होत आहे.

---

✧ 'पुरुषांना एक आवडती तर दुसरी नावडती असे असते.

✧ निदान खाण्याच्या बाबतीत तरी. एक आई व दुसरी पत्नी. पैकी कोणीतरी आवडते असेल तर दुसरे नावडते ठरते.

✧ एकीचा स्वैपाक मिळमिळीत तर दुसरीचा चवदार वाटतो. नावडतीने कितीही मन लाऊन पदार्थ बनवला तरी त्यात काहीतरी उणे काढले जाते असे म्हण सुचवते. असो.

✧ तीच गोष्ट अन्य ठिकाणीही लागू होते असे व्यवहारात दिसते. एखाद्या गोष्टीचा तिटकारा निर्माण झाला की त्याला नावे ठेवण्यासाठी मनात कल्पना विस्तार सुरू होतो.

✧ नाडी ग्रंथांना असेच नावडतेपण सहन करावे लागते.

✧ नावडतीच्या स्वयंपाकातील मीठासारखा पदार्थ, जो तयार होण्यात नावडतीचा अजिबात संबंध नसतो, तरीही तिला बोल लावायला ते कारण सोईंचे जाते म्हणून वापरले जाते.

✧ म्हणीत निदान पदार्थाची चव घेऊन म्हटले जाते असे सूचित होते.

✧ नाडी ग्रंथाबाबत (नावडतीच्या) कथनांची (चव) अनुभव घ्यायची तसदी न घेता नाडीतील संकल्पनांचे 'मीठ अळणी' म्हणून संभावना करताना पाहून ती म्हण अन्य कारणांना देखील कशी चपखल लागू पडते याचा प्रत्यय येतो.

## ✧ नाडीग्रंथांचे मीठ अळणी निदान आहे का नाही याचा अनुभव काय हरकत आहे.




## कव्वालीचा मुकाबला

- कव्वाली गान प्रकारात एका विषयावर आपापली मते काव्यात गुंफून टाळ्यांच्या हेकेखोर तालावर दोन बाजू मांडल्या जातात. प्यार ही 'कामकी' चीज़ आहे असे एक बाजूचे म्हणतात तर दुसऱ्या बाजूचे बस 'नामकी' चीज़ असा सूर लावतात. असाच एक विषय आहे. फलज्योतिष....
- फलज्योतिषवादी  फलज्योतिष एक प्रकांड शास्त्र आहे. असा सूर लावतात. तर  विरोधक ज्योतिष एक थोतांड शास्त्र आहे असा ताल धरतात.
- ग्रह-तारे यांचा मानवी जीवनावर प्रभाव पडतो काय? अथवा नाही? यावर चर्चा रंगतात. तो प्रत्यक्षात तसा पडत नाही असे

जाणवते. तरीही तो पडतो असे म्हणणाऱ्यांचे काय कारण असावे?

- आपण एक उदाहरण घेऊ. असे पहा की एखाद्या गजबजलेल्या चौकात लाल दिवा बंद होण्याची वाट पहाणारे वाहनचालक तो हिरवा होताच आपापली वाहने दामटतात. आता लाल दिव्यात वाहने थांबवण्याचा वा हिरव्या दिव्यात त्यांना जाऊ देण्याचा प्रभाव टाकायची 'शक्ती' आहे. कारण त्याप्रमाणे वाहने नियंत्रित होताना दिसतात. एकदा तशी प्रभाव-शक्ती आहे असे म्हटले तर मग ती स्पंदनाच्या, चुंबकीय शक्तीच्या किंवा आणखी कुठल्या रुपाने अस्तित्वात आहे असे विविध तर्क समर्थनासाठी द्यावे लागतात. पण तशी काही प्रभाव-शक्ती नाही हे जनसामान्याला कळते. मग ते आहे काय?
- दिव्यांच्या रंगांनी वाहतूक नियंत्रण करणारी एक व्यवस्था तयार केली गेली आहे. त्या व्यवस्थेची माहिती वाहनचालकांना आहे. म्हणून ते ते रंग चालकांच्या गतीवर प्रभाव टाकतात. त्या त्या रंगातील चुंबकीय शक्तीच्यामुळे नाही. एखादे आजोबा सहाच्या भोंग्याला पहाटे फिरायला जाताना दिसतात. तेंव्हा त्या भोंग्यातील ध्वनिकंपने त्यांच्यावर प्रभाव शक्ती टाकून फिरायला जायला भाग पाडतात असे त्याचे कारण नसून भोंग्याच्या आवाजावर फिरायला निघायचे असा परिपाठ वा व्यवस्था आजोबांनी ठरवली म्हणून तसे घडते.
- फलज्योतिष अशीच एक व्यवस्था आहे असे मानले तर? जीवनाचा मीटर डाऊन होतो तो जन्माने. त्यावेळी

अवकाशात ग्रह गोलांची काय स्थिती होती ती आणि जीवनातील विविध समस्यांच्या काळातील त्यावेळची ग्रहगोलांची परिस्थिती याला कुंडली किंवा पत्रिकेच्या रुपात तयार करून यांच्या एकमेंकांशी असलेल्या परस्पर संबंधांना, व्यवस्थेच्या आडाख्यातून पूर्वसुरींनी सूत्रे बांधली असावीत. अमुक अमुक अशी ग्रहांची अवकाशात स्थिती असेल आणि जर व्यक्तिच्या जन्म कुंडलीतील तमुक तमुक ग्रहदशा असेल तर त्याचा विवाहयोग घडून येण्याची शक्यता निर्माण होते. असा सूत्ररुपाने आडाखा ज्या व्यक्तिंना अभ्यास करून लावता येतो ते त्यानुसार आपले अंदाज व्यक्त करतात.

- लाल दिवा व्हायच्या आधीच काही महाभाग वाहने दामटताना दिसतात. कधी कधी नंतर गोत्यात येतात. हिरवा दिवा झाला म्हणून वाहन चौकातून पुढे जाईलच असेही नाही. कारण यंत्रशक्तीत बिघाड झाला, इंधन संपले अशा अनेक कारणानी वाहतूक व्यवस्थेला बाधा येईल. कधी कधी एखाद्या वाहनाला चौकातून पुढे गेल्यावर अपघात झाला. तर त्या अपघाताला जसा चौकातील हिरव्यारंगाच्या दिव्याला जबाबदार धरता येणार नाही किंवा अशा विविध कारणांसाठी नियंत्रण व्यवस्थेला दोष देता येणार नाही. तसेच विविध सूत्राद्वारे पत्रिकेत योग दिसले तरी अन्य कारणे जास्त प्रभावी असतील तर तो योग घडणार नाही किंवा पुढे-मागे, कमी-जास्त होऊन घडेल. अशा परिस्थितीत फलज्योतिष नामक व्यवस्थेला दोष देणे हे कितपत योग्य याचा विचार व्हावा.

- प्राचार्य अद्वयानंद गळतगे यांच्या ‘विज्ञान आणि चमत्कार’ नामक ग्रंथात ‘सावित्री’ या योगी अरविंदांनी लिहिलेल्या महाकाव्यातील संदर्भ याबाबत दिला आहे.
- ज्यांना ग्रहगोलांच्या नकाशाच्या कुंडल्या वा पत्रिकांचे कागद जाळून वा फलज्योतिष या व्यवस्थेला नाकारून कव्वालीला रंग भरायचा आहे, त्यांना कोणता लाल दिवा थांबवणार?

**नाडी पट्टीची कसोटी घ्यायला का घाबरतात?**

**आपले पितळ उघडे पडेल याची भिती वाटते..!**

➢ आटपाट नगरीचे राजे -

- अरे कोण आहे रे तिकडे?
- पर्धानजींना ताबडतोब बोलवा.
- शिपाई - जी, महाराज.
- पर्धानजी येतात...
- ओ...पर्धानजी, आपल्या नगराच्या हद्दीत कोणाला तरी नाडीची कसोटी घ्यायला पाठवा बरें ... आणि हो, निकाल काय लागला तो आमच्या जनानखान्यात कळवायची व्यवस्था करा बरें...
- ....
- पर्धानजी - आपली नाडी निघाली. प्रकरण जरा नाजुक हाय महाराज. आपली भागुबाई उघडी पडली... आपण जातीने त्याचा समाचार घ्यावा ...
- राजे - बरं ऽऽ बरं...!

# नाडी वाचक शिष्यगण तयार करणारे नाडी महर्षी

नाडीग्रंथांच्या ताडपट्ट्या लिहून काल उलटल्यावर वेगवेगळ्या महर्षींच्या शिष्यांच्याकडे त्या वाचनासाठी हाती आल्या. त्यांनी आपल्या शिष्यांना तमिळलिपीचा अभ्यास कसा करावा त्यातील एकाच शब्दाचे अनेक छटांचे अर्थ कसे ओळखावेत व जातकाला त्यातील कुठला अर्थ महर्षींना अभिप्रेत आहे. याचे रोज शिक्षण देताना... त्यांच्या झोपडीवजा आश्रमाचे चित्र हिरेमठांनी इतके बोलके काढले आहे. घरगुती वातावरणाची निर्मिती, 'जेवण तयार आहे' असा निरोप देणारी गुरुजींची मुलगी सांगते आहे. यातून दर्शवले गेले आहे.



...

दुसऱ्या एका महर्षींच्या आश्रमात ते आपल्या दिव्य दृष्टीने आकाशिक लेखन वाचून शिष्यांसमोर लिहून ठेवायला सांगत आहेत. समोर बसलेल्या लेखनिक शिष्यांना चकित होऊन, हे कसे शक्य आहे असे अविश्वासाचे बोल आपापल्यात हलक्या आवाजात बोलत आहेत. वेषभूषा, रेडिओ, टिव्ही, मोबाईल, विमान, कागदी पैसे अशा संकल्पना त्यांच्या डोळ्यासमोर दिसत नसल्याने जे सध्या अनुभवता येत नाही अशा बद्धल कल्पना करत कसे काय लिहावे असा पेच पडलेला आहे असे चित्र सुचवतेय. पण

नंतर अशा अनेक गोष्टी भविष्यकाळात शक्य आहेत असे समजून लिहायला वाहून घेतायत. हे सर्व भाव टिपणारे के. हिरेमठांचे चित्र.



# नाडी महर्षी आजही जीवंत आहेत?

# होय...!

अगस्त्य महर्षी जीव नाडीत म्हणतात, मी ताम्रपर्णी नदीवर स्नान करून आत्ताच ध्यान संपवून सदुरगिरीवरून निघालोय. हिमालयात तपस्येसाठी जात असतो. आम्ही मनोनिग्रहाने अवकाशातून विचरण करून जातो.



महर्षी अत्री व माता अनुसूया विविध धार्मिक मंदिरांच्या भेट देतात आणि नंतर समोर आलेल्या जातकांना आपल्या मधुरवाणीने त्यांच्या जीवनातील समस्या निवारण करतात.

काग(क) पु(भुषुंडि)जंदर महर्षी आपल्या काकदृष्टीने जातकांच्या दुःखाला हळुवार फुंकर मारून नष्ट करतात.

आपल्याला नजरेस न दिसणारे महर्षी आजही जीवनाडी कथनातून भेटतात. बोलतात. आदेश देतात.

पूर्वीच्या काळापासून शांतीदीक्षा करायला यजमान प्रत्यक्ष हजर राहून ते सर्व सोपस्कार आपल्या समोर करवून घेणारे आजही हिराभाई बुटाला व कौस्तुभ बुटाला यांच्यासारखे पिता-पुत्र, मनोज भाई , विवेक भाई तत्परतेने कार्यरत आहेत.

इरट्टै जीवनाडीचे वाचक डॉ. ए. आर. ॐ उलगनाथन् एक प्रचंड प्रस्थ आहे. त्यांच्या पढव्या आणि सन्माननीय सन्मान वाचून  कळून येईल.



श्री. व सौ. देवळे आपल्या प्रतिशिर्डी धार्मिक मंदिर संकुलासाठी, डॉ ॐ उलगलाथन यांच्या ईश्ट्टै आणि रमणी गुरुजींच्या काग पुजंदर जीवनाडी कथनातून मार्गदर्शन घेतात...




स्वामी शशिकांत ... श्रीनिवास प्रभुदेसाईंच्या कुंचल्यातून साकार कलाकृती